**१४ व्या वित्त आयोगांतर्गत औरंगाबाद विभागात बीड, जालना, उस्मानाबाद व परभणी येथील नगरपालिका/ महानगरपालिका हद्दीतील क्षेत्रासाठी नव्याने स्थापन केलेल्या कौटुंबिक न्यायालयाकरिता पदनिर्मिती करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्रमांक: कौटुन्या-१११६/३७६/प्र.क्र.८६/का-९**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक: १५ जून, २०१७

**वाचा :-**

१. केंद्र शासनाचे दि. २९ मे, २०१५ चे पत्र (१४ व्या वित्त आयोगाच्या शिफारशी)
२. शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्र.चौविआ-१२६/प्र.क्र.१०/का-नऊ, दि. ०९ मार्च,२०१६.
३. मा. उच्च न्यायालयाची दि.२७ जून, २०१६, दि. २६ जुलै,२०१६ व दि.२९ ऑगस्ट, २०१६ ची पत्रे.
४. केंद्र शासनाचे दि.२६ मे, २०१६ चे पत्र.
५. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र चौविआ-१२१५/प्र.क्र.९४/१५/का-नऊ, दि.२३.०८.२०१६
६. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र.कौटुंन्या १११६/३७६/प्र.क्र.८६/का-९, दि.१३.१०.२०१७
७. वित्त विभागाचे दि.०६.०६.२०१७ रोजीचे उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीचे कार्यवृत्त.

**प्रस्तावना :-**

कौटुंबिक न्यायालय अधिनियम १९८४ च्या कलम ३ अन्वये मा. उच्च न्यायालयाच्या सहमतीने शहरी/ नागरी प्रदेशाकरिता कौटुंबिक न्यायालय स्थापन करण्याची तरतूद आहे. तसेच १४ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार राज्यातील ज्या जिल्ह्यात कौटुंबिक न्यायालय कार्यान्वित नाही अशा जिल्ह्याच्या ठिकाणी किमान एक कौटुंबिक न्यायालय स्थापन करण्याची तरतूद आहे. त्यानुसार मा. उच्च न्यायालयाने संदर्भिय अनुक्रमांक ३ येथील पत्रान्वये प्रस्ताव सादर केला होता. त्यानुषंगाने औरंगाबाद विभागातील बीड, जालना, उस्मानाबाद व परभणी या जिल्ह्यांच्या ठिकाणी प्रत्येकी एक कौटुंबिक न्यायालय स्थापन करण्याचा संदर्भीय अनुक्रमांक ६ येथील शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. तथापि सदर न्यायालयांसाठी निर्माण करावयाच्या पदांबाबत उच्चस्तरीय सचिव समितीच्या निर्णयानंतर पदनिर्मितीचे आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

१४ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार तसेच कौटुंबिक न्यायालय अधिनियम १९८४ च्या कलम ३ अन्वये राज्यातील बीड, जालना, उस्मानाबाद व परभणी येथील नगरपालिका/ महानगरपालिका हद्दीतील क्षेत्रासाठी, प्रत्येकी एक याप्रमाणे ४ कौटुंबिक न्यायालये स्थापन करण्यात आली आहेत. या ४ कौटुंबिक न्यायालयासाठी पदनिर्मितीचा प्रस्ताव उच्चस्तरीय सचिव समितीसमोर सादर केला होता. या समितीने बीड, जालना, उस्मानाबाद व परभणी या ४ कौटुंबिक न्यायालयासाठी खालीलप्रमाणे पदनिर्मीती करण्यास मान्यता दिली आहे. त्यानुसार प्रत्येक कौटुंबिक न्यायालयांकरिता पुढीलप्रमाणे पदनिर्मीती करण्यात येत आहे.

- न्यायाधीश व त्यांचा सहाय्यभूत कर्मचारी वर्ग (प्रत्येकी एक कौटुंबिक न्यायालयासाठी)

| अ.क्र. | पदनाम | वेतनक्षेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | न्यायाधिश | ५१५५०-१२३०-५८९३०-१३८०-६३०७० | १ |
| २ | प्रबंधक | ९३००-३४८०० + ग्रेड पे ५४०० | १ |
| ३ | सहायक अधीक्षक | ९३००-३४८०० + ग्रेड पे ४४०० | १ |
| ४ | लघुलेखक (उ.श्रे.) | ९३००-३४८०० + ग्रेड पे ४४०० | १ |
| ५ | विवाह समुपदेशी | १५६००-३९१०० + ग्रेड पे ५४०० | १ |
| ६ | वरिष्ठ लिपिक | ५२००-२०२०० + ग्रेड पे २४०० | १ |
| ७ | लिपिक-टंकलेखक | ५२००-२०२०० + ग्रेड पे १९०० | ३ |
| ८ | शिपाई/पहारेकरी | ४४४०-७४४० + ग्रेड पे १३०० | ३ |
| | एकूण | | १२ |
| | एकूण ४ कौटुंबिक न्यायालयांसाठी एकूण पदे (१२X४) | | ४८ |

- वाहनचालकांची काल्पनिक पदे

| अ.क्र. | पदनाम | वेतन | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | वाहन चालक | ठोक माशिक मानधन (बाह्ययंत्रणेद्वारे) | १ |
| | एकूण ४ कौटुंबिक न्यायालयांसाठी | | ४ |

२. उपरोक्त अस्थायी पदे दि.२८ फेब्रुवारी, २०१८ पर्यंत चालू ठेवण्यास शासन मंजूरी देण्यात येत असून सदर अस्थायी पदांना दि.२८ फेब्रुवारी, २०१८ नंतर पुढील मुदतवाढ घेणे आवश्यक आहे.

३. याकरिता येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान-१०५ दिवाणी व सत्र न्यायालये-(०१)(०२) प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, संकेतांक २०१४ ०३४१, या लेखाशिर्षाखाली त्या-त्या वित्तीय वर्षासाठी मंजूर होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४२/आपुक, दिनांक १३.०२.२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०६१६१२१८४६३६१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Neeraj Pradip Dhote

Digitally signed by Neeraj Pradip Dhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ecf8ac6cd2050be6b2f1a2e67257b46e511d059da5a2b598b641533ab0393dac, cn=Neeraj Pradip Dhote
Date: 2017.06.16 12:16:40 +05'30'

**(नी. प्र. धोटे)**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रतः**

१. मा.राज्यपालाचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई
४. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
५. सर्व अ.मु.स. /प्र.स./सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
७. सर्व प्रमुख न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्यायालये, कौटुंबिक न्यायालये,
८. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा / मुळ शाखा), मुंबई,
९. प्रबंधक, उच्च न्यायालय, नागपूर, औरंगाबाद व पणजी खंडपीठ,
१०.संचालक, अभियोग संचालनालय, मुंबई,
११.सह संचालक, न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, उत्तन/नागपूर,
१२.सदस्य सचिव, विधि सेवा प्राधिकरण, मुंबई,
१३.महालेखापाल- एक (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई,
१४.महालेखापाल- एक (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर,
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१७.वित्त विभाग, वित्त आयोग कक्ष /व्यय-६/ अर्थ-११,
१८.विधि व न्याय विभागातील सर्व कार्यासने.
१९.निवड नस्ती.